**डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेत संचालक या पदावर प्रतिनियुक्तीने कार्यरत असलेले श्री.संजय बाहेकर, उप कुलसचिव राष्ट्रसंत तुकडोजी महाराज विद्यापीठ, नागपूर यांच्या प्रतिनियुक्तीस मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : विप्रप्र-२०१८/प्र.क्र. १०६/१८/१२-अ,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ५ सप्टेंबर, २०१८.

**संदर्भ :-** १) शासन आदेश क्र.विप्रप्र २०१३/मुमंस ०८/प्र.क्र.१२०/१३/१२अ, दि.२५.७.२०१३.
२) शासन आदेश क्र.विप्रप्र-२०१६/२४०/प्र.क्र.४०/१६/१२अ, दि.४.१०.२०१६.
३) शासन निर्णय सा.प्र.वि.क्र.एसआरव्ही २०११/प्र.क्र.१३७/कार्या-१२, दि.१७.१२.२०१६.
४) शासन निर्णय सा.प्र.वि.क्र.एसआरव्ही २०१६/प्र.क्र.५१०/कार्या-१२, दि.१६.२.२०१८.
५) शासन निर्णय क्र.विप्रप्र २०१८/प्र.क्र.१०६/कार्या-१२अ, दि.६.८.२०१८.

**शासन निर्णय :-**

श्री.संजय बाहेकर, उप कुलसचिव राष्ट्रसंत तुकडोजी महाराज विद्यापीठ, नागपूर यांना संदर्भाधीन क्र.२ चे आदेशान्वये डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या प्रशिक्षण संस्थेतील संचालक या पदावरील प्रतिनियुक्तीस दि.२९ जुलै, २०१६ पासून पुढील २ वर्षांसाठी मुदतवाढ देण्यात आली होती. त्यानुसार त्यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी दि.२८ जुलै, २०१८ रोजी संपुष्टात आल्याने उक्त दि.६.८.२०१८ च्या शासन निर्णयान्वये श्री.बाहेकर यांची प्रतिनियुक्ती संपुष्टात आणून त्यांना कार्यमुक्त करण्यात आले होते. परंतू त्यानंतर श्री.संजय बाहेकर यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी पुन्हा १ वर्षाने वाढविण्याबाबत शासन स्तरावर निर्णय घेण्यात आला आहे. त्यास अनुसरुन श्री.संजय बाहेकर यांना डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेत संचालक पदावर दि.२९.०७.२०१८ ते २८.०७.२०१९ या एक वर्ष कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. तरी त्यानुसार संबंधित विभागांनी उपरोक्त अधिकारी यांच्या प्रतिनियुक्तीच्या मुदतवाढीची नोंद घेऊन आवश्यक ती कार्यवाही करावी.

३. सदर प्रतिनियुक्ती महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा...) नियम १९८१ च्या परिशिष्ट-२ मधील खालील अटी व शर्तींच्या अधीन राहील.

१) प्रस्तुत प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी संबंधित विभागास लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने सेवेची आवश्यकता वाटल्यास सदर अधिकाऱ्यास परत बोलविण्यात येईल. डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेस वरील अधिकाऱ्याच्या सेवेची आवश्यकता

नसल्यास संबंधितांना ३ महिन्याची नोटीस द्यावी लागेल. त्याचप्रमाणे, शासनास सदर बाब अवगत करण्यात यावी.

२) प्रतिनियुक्ती कालावधीतील वेतनाचा/रजा वेतनाचा खर्च डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेने करावा.

३) महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा...) नियम १९८१ च्या परिशिष्ट-४ मध्ये विहित केलेल्या दरानुसार डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेकडून रजा वेतन व निवृत्ती वेतन अंशदान देण्यात यावे.

४) सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधीमधील वर्गणी चालू ठेवण्यात यावी.

५) संबंधित अधिकाऱ्याविरुद्ध विभागीय चौकशी करावयाची झाल्यास त्यांच्या सेवा मूळ विभागाकडे परत करण्यात याव्यात.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्य www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०९०५१४४२१८०९०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vilas Ramdas Thakur

Digitally signed by Vilas Ramdas Thakur
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=CMTD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cb156fb408217396128e8dcaeed3f6fa70d9fd209eb9efc83bdd68b308614534, cn=Vilas Ramdas Thakur
Date: 2018.09.05 14:47:06 +05'30'

( वि. रा. ठाकूर )
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति :-**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) महासंचालक, यशदा, पुणे.
३) विभागीय आयुक्त, अमरावती
४) संचालक, डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती
५) उप सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती.
७) उप कोषागार अधिकारी, जिल्हा अमरावती.
८) श्री.संजय बाहेकर, संचालक, डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती
९) निवडनस्ती/१२-अ.

**प्रत अग्रेषित :-**

१) मा.राज्यमंत्री, सामान्य प्रशासन विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) अपर मुख्य सचिव (सेवा) यांचे स्वीय सहाय्यक, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.

********************